**डॉ.पंजाबराव देशमुख विदर्भ प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, अमरावती या संस्थेच्या ८ अस्थायी पदांना मुदतवाढ देणेबाबत.**
**( कालावधी दि.१.३.२०१७ ते दि.३०.९.२०१७ )**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक: विप्रप्र-२०१६/प्र.क्र.४०/१६/१२-अ,**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ९ मे, २०१७.

**वाचा** :- १. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक यशदा-२०१४/४४१/प्रक्र.९३/१४/ १२-अ, दिनांक ११ मे,२०१५
२. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय विप्रप्र-२०१६/प्र.क्र.४०/१६/१२-अ, दि. ८ मार्च,२०१६
३. वित्त विभाग शासन निर्णय क्र. पदनि२०१६/प्रक्र.८/१६/आ.पु.क. -१ दि. १०.२.२०१७
४. शासनाचे समक्रमांकाचा दि. ८ नोव्हेबर,२०१६ चा शासन निर्णय.
५. विशेष कार्य अधिकारी, डॉ. पंजाबराव देशमुख विदर्भ प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, अमरावती याचे क्रमांक प्रशा/कली. कावि/७०/२०१७ दि.२२.२.२०१७ चे पत्र.

**शासन निर्णय:**

डॉ. पंजाबराव देशमुख विदर्भ प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, अमरावती या संस्थेच्या आस्थापनेवरील ८ अस्थायी पदांना संदर्भाधीन क्र. ४ च्या शासन निर्णयान्वये दि.१.१०.२०१६ ते दि.२८.२.२०१७ पर्यंत मुदत वाढ देण्यात आली आहे. आता संस्थेने संदर्भ क्रमांक ५ च्या पत्रान्वये प्रस्तुत १० अस्थायी पदांना तात्पुरत्या स्वरुपात मुदतवाढ देण्याचा प्रस्ताव शासनास सादर केला आहे.

२. राज्य प्रशिक्षण धोरण २०११, अन्वये दि.१४.१०.२०१३ च्या शासन निर्णयान्वये ६ विभागीय प्रशासकीय प्रशिक्षण संस्था घोषित करण्यात आल्या आहेत. या संस्थांमधील पदांचा आकृतिबंध एकसमान असणे आवश्यक असल्यामुळे संदर्भाधीन क्र. १ च्या शासन निर्णयान्वये २० पदांचा आकृतिबंध निश्चित करण्यात आला आहे.

सदर संस्थेंमध्ये आकृतिबंध मंजूर करण्यापूर्वीची एकूण १५ पदे मंजूर होती. त्यापैकी ५ पदे स्थायी असून, १० पदे अस्थायी स्वरुपाची आहेत. नवीन आकृतिबंधातील २० पदांपैकी सहायक प्राध्यापक वर्ग-१ ची ८ पदे ही रु.१५६००-३९१०० ( ग्रेड पे -५००० ) या वेतनश्रेणी मधील असून, संस्थेची पूर्वीची सहायक प्राध्यापक वर्ग-१ ची २ पदे ही, समकक्ष वेतन श्रेणीतील असल्यामुळे सदर २ पदे संदर्भाधीन क्र.२ च्या शासन निर्णयानुसार नवीन आकृतिबंधातील पदांमध्ये समायोजित करण्यात आली आहेत. त्यानुसार संस्थेमध्ये आता ८ पदे अस्थायी आहेत.

३. संस्थेमध्ये सद्य: स्थितीत राज्य प्रशिक्षण धोरणानुसार वर्ग-२ व वर्ग-३ च्या अधिकारी कर्मचारी यांचे सुरू असलेले प्रशासकीय प्रशिक्षण आणि भविष्यात एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षणानुसार चालू होणारे वर्ग-२ च्या अधिका-यांचे तांत्रिक प्रशिक्षण या बाबींचा विचार करता, तसेच संस्थेमधील पदांचा सुधारित आकृतिबंधास मान्यता मिळण्यास काही कालावधी लागण्याची शक्यता विचारात घेता, संस्थेच्या ८ अस्थायी पदांना मुदतवाढ देणे अपरिहार्य आहे.

४. उपरोक्त सर्व बाबींचा सर्वकष विचार करुन आता, प्रस्तुत शासन निर्णयान्वये डॉ. पंजाबराव देशमुख विदर्भ प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, अमरावती या संस्थेच्या आस्थापनेवरील खाली नमूद केलेल्या **पूर्वीच्या उर्वरित ८ अस्थायी पदांना दि.१ मार्च २०१७ ते दि. ३० सप्टेंबर, २०१७ या सात महिन्याच्या कालावधीसाठी मुदतवाढ** देण्यात येत आहे.

| अ.क्र. | पदांची नांवे | पदसंख्या | वेतनश्रेणी |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | लेखाधिकारी वर्ग-२ (लेखाधिकारी संवर्ग) | १ पद | ९३००-३४८०० ( ग्रेड वेतन ४६०० ) |
| २ | सत्र समन्वयक ( नायब तहसिलदार संवर्ग ) | १ पद | ९३००-३४८०० ( ग्रेड वेतन ४३००) |
| ३ | सत्र समन्वयक | १ पद | ९३००-३४८०० ( ग्रेड वेतन ४३०० ) |
| ४ | सत्र सहाय्यक | १ पद | ५२००-२०२०० ( ग्रेड वेतन १९०० ) |
| ५ | शिपाई | १ पद | ४४००-७४०० ( ग्रेड वेतन १३०० ) |
| ६ | वाहन चालक | १ पद | कंत्राटी पध्दतीने |
| ७ | चौकीदार | १ पद | कंत्राटी पध्दतीने |
| ८ | सफाईगार | १ पद | कंत्राटी पध्दतीने |
| | एकुण | ८ पदे | |

५. याबाबत होणारा खर्च मागणी क्र.ए-४, **मुख्य लेखाशिर्ष "२०७०-इतर प्रशासनिक सेवा- (००३) प्रशिक्षण-(००) (०८) डॉ. पंजाबराव देशमुख विदर्भ प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, अमरावती या संस्थेस सहाय्यक अनुदान ( अनिवार्य ) (२०७० ०७५५) ३६- सहाय्यक अनुदान ( वेतने )"** या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व **सन २०१७-२०१८** या आर्थिक वर्षासाठीच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

६. हा शासन निर्णय, वित्त विभाग, शासन निर्णय क्र. पदनि२०१६/प्रक्र.८/१६/आ.पु.क. दि.१०.२.२०१७ अन्वये मंत्रालयीन प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१७०५०९११५८४५७००७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Vijaykumar Parshuram Soshte

Digitally signed by Vijaykumar Parshuram Soshte
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=106ede43bb7dcc67e6404aaa146fb4c17a872b3754b63c343b66d6b91dd6b276, cn=Vijaykumar Parshuram Soshte
Date: 2017.05.09 11:59:56 +05'30'

( वि. प. सोष्टे )
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता /लेखा परीक्षा), महाराष्ट्र - १ मुंबई .
२) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), महाराष्ट्र - २, नागपूर.
३) मा. अ.मु.स. (सेवा) सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
४) विभागीय आयुक्त, अमरावती विभाग, अमरावती.
५) विशेष कार्य अधिकारी, डॉ. पंजाबराव देशमुख विदर्भ प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, अमरावती
६) लेखाधिकारी, डॉ. पंजाबराव देशमुख विदर्भ प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, अमरावती.
७) उप संचालक, लेखा व कोषागारे संचालनालय, अमरावती.
८) जिल्हा कोषागार अधिकारी, अमरावती,/ ९) उप कोषागार कार्यालय, अमरावती.
१०) वित्त विभाग, कार्यासन -आ.पु.क. व व्यय- ४ मंत्रालय, मुंबई-३२
११) निवड नस्ती.